**अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील**
**नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबत**
**संस्था/शाळांना मंजूरी- शैक्षणिक वर्ष २०११-१२**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक :- नानिशा-२०११/प्र.क्र२१/का.१२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ६ ऑगस्ट, २०११**

**संदर्भ:-** १) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३, दि.२८/८/२००९.
२) प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांचे अध्यक्षतेखाली आयोजित दि.११/७/२०११ रोजीची बैठक.

**शासन निर्णय** :- इयत्ता पहिली ते बारावीपर्यंतच्या अनूसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमांच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याचा निर्णय संदर्भीत दि.२८/८/२००९च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. यास अनुसरून विभागास प्राप्त झालेल्या इंग्रजी माध्यमांच्या नामांकित शिक्षण संस्थांच्या प्रस्तावाची तपासणी करण्यात आल्यानंतर विहित निकष पुर्ण करीत असलेल्या खाली नमूद केलेल्या संस्थांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या विद्यार्थी संख्येच्या मर्यादेत विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इयत्ता पहिलीमध्ये प्रवेश देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | नामांकित शाळेचे नांव व पत्ता | सन २०११-१२ मधील विद्यार्थी संख्या |
|---|---|---|
| १ | अमृत वाहिनी मॉडेल स्कुल संगमनेर ता. संगमनेर, जि. अहमदनगर | ५० |
| २ | इंग्लीश मिडीयम स्कूल आणि ज्युनियर कॉलेज, लोणी | ५० |
| ३ | रामराव आदिक पब्लिक स्कुल, अशोकनगर श्रीरामपूर, जि. अहमदनगर | ५० |
| ४ | ब्रान्र्स हायस्कूल आणि ज्युनियर कॉलेज, पनवेल | ५० |
| ५ | सेंट उर्त्सुला गर्ल्स हायस्कूल, सिव्हिल लाईन, नागपूर | ५० |
| ६ | ज्ञानदीप कॉन्व्हेंट शितलवाडी, रामटेक | ५० |
| ७ | आदर्श संस्कार विद्यालय, वृंदावन नगर, नागपूर | ५० |
| ८ | गोदावरी मनार पब्लीक स्कूल, शंकरनगर, नांदेड | ५० |
| ९ | सेंट झेवीअर्स स्कूल श्रीरामपूर, जि. अहमदनगर | ५० |
| १० | शरद पवार पब्लिक स्कुल, मानुर, ता. कळवण, जि. नाशिक | ५० |
| ११ | ब्रम्हाव्हॅली पब्लिक स्कुल अंजनेरी, ता. त्र्यंबकेश्वर, जि. नाशिक | ५० |
| १२ | बियानी पब्लिक स्कुल, भुसावळ | ५० |
| १३ | केंब्रीज हायस्कुल भिलार, ता. महाबळेश्वर, जि. सातारा | ५० |
| १४ | शिवनेरी स्कुल (सिबीएसई सलग्न ), खानापूर, पुणे | ५० |
| १५ | भारती विद्यापीठ,इंग्रजी माध्यमाची शाळा, जव्हार | ५० |
| १६ | एस.एम.बाथा एज्युकेशन ट्रस्ट, पाचगणी | ५० |
| १७ | भावना पब्लीक स्कुल, देगांव ता. रिसोड, जि. वाशिम | ५० |
| १८ | स्कुल ऑफ ब्रिलियंट, वर्धा | ५० |
| १९ | मॅकरुन स्टुडटस ॲकडमी ,चंद्रपूर | ५० |
| २० | होलीक्रॉस कॉन्व्हेट ॲन्ड हायस्कुल, बुटीबोरी ता.जि.नागपूर | ५० |

**१) विहित अटी व शर्ती :**

**अ)** ज्या संस्थांचे दर प्रति विद्यार्थी वार्षिक रु. ५०,०००/-पेक्षा जास्त आहेत अशा संस्थांना रु.५०,०००/- मध्ये संबंधित संस्थेने शासनाला सादर केलेल्या प्रस्तावामध्ये नमूद केलेल्या सर्व सुविधा देणे बंधनकारक राहील.

**ब)** ज्या संस्थांचे दर प्रति विद्यार्थी वार्षिक रु. ५०,०००/- पेक्षा जास्त आहेत अशा संस्थांना लेखी स्वरुपात कळवून ते रु. ५०,०००/- मध्ये आदिवासी विद्यार्थ्यांना प्रवेश देऊन संबंधित संस्थेने शासनाला सादर केलेल्या प्रस्तावात नमूद केल्याप्रमाणे सर्व सोयी सुविधा देण्यास तयार आहेत याची खातरजमा करावी व तसे हमीपत्र घ्यावे.

**क)** ज्या संस्थांचे दर प्रति विद्यार्थी वार्षिक रु. ५०,०००/- पेक्षा कमी आहेत त्या संस्थांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावात नमूद केलेल्या रकमेतच प्रस्तावातील सर्व सुविधा दयाव्या लागतील.

**ड)** संस्थेने आदिवासी विद्यार्थ्यांसाठी वेगळी तुकडी / वर्ग सुरु करणे अपेक्षित नाही. त्यांनी सुरु असलेल्या तुकडी/ वर्गामध्येच विद्यार्थ्यांना प्रवेश देणे बंधनकारक राहील.

**इ)** विदयार्थी संख्येच्या कमाल मर्यादेचे (१०० विदयार्थी) काटेकोर पालन करण्यात यावे.

**ई)** आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का.१३,दि.२८/८/२००९ मध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

**२)** ज्या नामांकित संस्थेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांस प्रवेश देण्यात येणार आहे, त्या संस्थेबरोबर संबंधित प्रकल्प अधिका-यांनी करारनामा करावा. तसेच त्यामध्ये मुलांचे शिक्षण, आरोग्य, सुरक्षा, निवास, आहार व अन्य सुविधा तसेच संस्थेच्या प्रस्तावातील सर्व सोयी सुविधा या मुद्यांचा समावेश करण्यात यावा.

**३)** नामांकित इंग्रजी शाळेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांची प्रवेश प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर सदर संस्थेने प्रस्तावित केलेल्या शुल्काच्या (कमाल रु. ५०,०००/-) ५० टक्के शुल्क संस्थेस अदा करण्यात यावे. उर्वरित ५० टक्के शुल्क शैक्षणिक वर्षाच्या शेवटच्या सत्राच्या परिक्षेपूर्वी संस्थेस अदा करण्यात यावे. या योजनेची अंमलबजावणी संबंधित प्रकल्प अधिकारी करतील तसेच संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास योजनेचे "पर्यवेक्षकीय अधिकारी"म्हणून व आयुक्त, आदिवासी विकास नाशिक हे " नियंत्रक अधिकारी " म्हणून जबाबदारी पार पाडतील.

४) या योजनेसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

" मागणी क्र. टी ५

२२२५- अनुसूचित जाती, जमाती व इतर मागास वर्ग यांचे कल्याण-

पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना-जनजाती क्षेत्र उपयोजना-

०२- अनुसूचित जमातीचे कल्याण

७९६ जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना- राज्य योजनांतर्गत योजना

(०२) जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना

(०२) (२९)- अनुसूचित जमातीच्या विदयार्थ्यांना इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे.

(२२२५ C-९९९) ३१ " सहायक अनुदाने (वेतनेत्तर) "

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०११०८०६१६४४१५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(कैलास द. भंडलकर )
उप सचिव

**प्रति-**

मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
मा.उपमुख्यमंत्री यांचे कार्यालय,



के मा प

मा.मुख्य सचिव यांचे कार्यालय,
मा.मंत्री, आदिवासी विकास/मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
सर्व विधानसभा सदस्य,
सर्व विधान परिषद सदस्य,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
संचालक, आदिवासी विकास महामंडळ.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
सर्व सहआयुक्त, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती,
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा)/ महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/प्रशासकीय भवन, वांद्रे (पूर्व) मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व संबंधित संस्था/शाळा मार्फत संबंधित प्रकल्प अधिकारी.
सर्व जिल्हाधिकारी
विधानमंडळ ग्रंथालय ( १० प्रती)
माहिती व जनसंपर्क संचालनालय ( ५ प्रती)
सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्ष यांचे मध्यवर्ती कार्यालय
आदिवासी विकास विभागातील सर्व कार्यासने मंत्रालय मुंबई-३२
सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी मंत्रालय मुंबई-३२
प्रधान सचिव (आ.वि.) यांचे स्वीय सहायक. मंत्रालय मुंबई-३२
निवड नस्ती-का-१२